२० सप्टेंबर १९९५ रोजी भारतात व भारताबाहेरसुद्धा गणपती दूध प्याल्याच्या बातम्या वृत्तपत्रातून झळकल्या. नामदेवाचा नैवेद्य विठ्ठलाने खाल्ल्याची कथा पुराणात वर्णिलेली आहे. अशा कथांवर विश्वास ठेवणारे हल्ली अंधश्रद्ध ठरतात. पण वरील गणपती दूध प्याल्याची घटना या विज्ञानायुगातील आहे. आणि ती नामदेवाप्रमाणे कुणा एखाद्या व्यक्तीचा नैवेद्य कुठल्या तरी एका देवळातील मूर्तीने खासगीरीत्या खाल्ला अशा प्रकारची नाही. सर्व भारतभर आणि इतर देशातही ती घटना घडली व सार्वजनिकरीत्या लाखो लोकांच्या साक्षीने घडली, असे वृत्तपत्रे, रेडिओ, दूरदर्शन या माध्यमातून प्रसिद्ध झाले आहे. आता नामदेवांची पुराणातली कथा खोटी कोण म्हणेल? पण ती खरी म्हटली तर विज्ञान खोटे ठरत नाही काय? बुद्धिवाद मोडीत निघत नाही काय? आणि हे कोण सहन करील ? म्हणून काही 'विज्ञानवादी' व बुद्धिवादी पुढे सरसावले व ही बनवेगिरी असल्याचे त्यांनी जाहीर करून टाकले. पण ही बनवेगिरी असेल तर देशविदेशातील लाखो लोकच नव्हे, तर काही जाणत्या व जबाबदार व्यक्ती, काही शास्त्रज्ञ व काही राज्याचे मुख्यमंत्रीही या बनवेगिरीत सामील झाले होते असे म्हणायचे काय? पण 'विज्ञान' व बुद्धिवाद यांच्यापुढे लाखो लोकांची, काही जाणत्या व जबाबदार व्यक्तींची, काही शास्त्रज्ञांची व काही मुख्यमंत्र्याची काय किंमत ? किंबहुना कुणाचीच काय किंमत ? 'विज्ञान' व बुद्धिवाद सुरक्षित राहणे महत्त्वाचे!


CITY EDITION

# Miracle or

## Ganesha Idols Around the World 'Drink' Milk

NEW DELHI—

यात सत्य काय होते? विज्ञान सत्याची बाजू घेत नाही काय ? बुद्धिवादाला सत्याचे वावडे आहे काय? 'गणपती दूध पितो' ही बनवेगिरीची घटना एका विशिष्ट दिवशी जो हिंदूंच्या वा कुणाच्याही दृष्टीने महत्वाचा नव्हता - घडवून आणण्यात इतक्या लोकांचा कोणता स्वार्थ दडला होता? आणि तो स्वार्थ उघडकीस कसा येऊ शकला नाही? 'गणपती दूध प्याल्या' मुळे तो कसा साधला गेला, हे त्यांनी का सांगितले नाही? बरे, यात बनवेगिरी आहे याची ग्वाही या बुद्धिवाद्यांची सदसद्विवेकबुद्धी त्यांना देत होती. तर त्यांनी पुढाकार घेऊन दिल्ली या भारताच्या राजधानीत ज्या राज्याच्या मुख्यमंत्र्यांनी स्वतःहा चमत्कार घडल्याचे स्वतःच्या हातांनी गणपतीला दूध पाजून जाहीर केले ही बनवेगिरी कशी आहे हे त्यांच्या केशाकर्षण (capillary) व पृष्ठताण (surface tension) या सिद्धांताच्या आधारे लोकांना जाहीररित्या सप्रयोग का दाखवून दिले नाही? ही 'अंधश्रद्धा' तशीच का चालू दिली? त्यांच्यापेक्षा एखाद्या रस्त्यावर चप्पल दुरुस्त करणाऱ्या चांभाराला शास्त्रीय ज्ञान व शास्त्रीय मान जास्त असल्याचा शोध केष्टा लागला ?

पण जाऊ द्या. हा एकच दिवसाचा चमत्कार होता. त्यामुळे औटघटकेच्या राजाप्रमाणे त्याला एवढे महत्त्व देण्याचे कारण नाही. इतकी वर्षे 'सत्य' ठरलेल्या 'विज्ञाना'ला व बुद्धिवादाला त्या औट घटकेच्या चमत्काराच्या वेदीवर बळी देण्याचे कारण नाही.

पण त्यांना असे औट घटकेच्या चमत्काराच्या वेदीवर बळी देण्याचे कारण असू नये इतके हे 'विज्ञान' व हा बुद्धिवाद इतकी वर्षे खरोखरच सत्य ठरले आहेत काय? अर्थात् विज्ञानाच्या कसोटीवरच हे ठरवावे व तपासावे लागेल. आणि अशा वैज्ञानिक कसोट्यावरच्या तपासण्या व पुरावे सादर करण्यासाठीच प्रस्तुत लेखकाने हे तीन ग्रंथ लिहिले आहेत. त्यात सादर केलेले अतींद्रिय विज्ञानाचे प्रत्यक्ष पुरावे पाहिल्यानंतर कुणालाही गणपती दूध प्याल्याच्या औट घटकेच्या चमत्काराच्या वेदीवर या 'विज्ञाना'ला व बुद्धिवादाला बळी देण्यात येत आहे, अशी तक्रार करायला कसलीही जागाच उरणार नाही.

आणि असले चमत्कार औट घटकेचे नसून सतत कसे घडत आहेत आणि तेही या 'विज्ञान' वाद्यांच्या व बुद्धिवाघांच्या नाकासमोरच कसे टिच्चून घडत आहेत, पण ते जणू घडतच नाहीत, अशा आविर्भावात हे लोक स्वतःच्या डोळ्यावर कातडे ओवून घेऊन कसे गप्प बसले आहेत, हे आता शेवटी या ग्रंथाच्या वाचकांना दाखवून द्यावयाचे आहे व त्यांचा निरोप घ्यावयाचा आहे. त्यामुळे गणपतीने (वा हिंदू देवतांनी) एकच दिवस दूध पिऊन या लोकांवर (व जगावर) कृपा केली अशा भ्रमात कोणी राहण्याचे कारण नाही.

जड मूर्ती दूध पिणे जितकी अशक्य गोष्ट आहे, तितकीच सजीव प्राणी अन्नपाण्याशिवाय जिवंत राहणे ही सुद्धा अशक्य गोष्ट आहे. विज्ञानाच्या नियमानुसार मनुष्यप्राणी अन्नपाण्याशिवाय फार दिवस जिवंत राहणेच शक्य नाही. जिवंत राहिला तरी तो जास्तीत जास्त किती दिवस राहील? गेली ५८ वर्षे एक व्यक्ती अन्नपाण्याशिवाय कर्नाटकात जिवंत आहे. अन्नपाण्याशिवाय जिवंत राहत असल्यामुळे तिला मलमूत्रविसर्जनही नाही. म्हणून त्या व्यक्तीची थुंक शास्त्रीय प्रयोगशाळेत तपासण्यासाठी अमेरिकेला नेण्यात आली. त्यामध्ये काय सापडणार? माणसाचे मन किंवा आत्मा हा मातीचा गोळा आहे अशा प्रमात हे भौतिक विज्ञानवादी अजूनही आहेत!



या विज्ञानाचा कैफ काही भारतीय योग्यांच्याही मनावर व बुद्धीवर असावा काय? धारवाडचे प्रसिद्ध योगी कुमारस्वामी यांनी तीन महिने सतत गुप्तचरांची पाळत ठेवून ती व्यक्ती खरोखरच अन्नपाण्याशिवाय जगत आहे काय याची खात्री करून घेण्याचे ठरविले आणि जेव्हा त्यांची ती खात्री पटली, तेव्हा या योग्याने त्या महायोगिनीच्या

पुढे अक्षरश: साष्टांग दंडवत घातला! ही महायोगिनी म्हणजेच कर्नाटकातील गुलबर्गा जिल्ह्याच्या सेडम तालुक्यातील माणक्यगिरीची प्रसिद्ध माणिक्यम्मा. ही महायोगिनी अन्नपाण्याशिवाय जिवंत राहण्याचाच पराक्रम करून थांबली नाही. तिने सार्वजनिकरीत्या लाखो लोकांच्या साक्षीने २ महिने १० दिवस हवाबंद जागेत पोलीस पाहयात समाधी घेतली आणि अगोदर सांगितल्याप्रमाणे ठराविक दिवशी म्हणजे महाशिवरात्रीच्या पहाटे बरोबर चार वाजण्याच्या ब्राह्म मुहूर्तावर बाहेर आली. कशी? तर सिमेंटची भिंत आपोआपच फुटून! लोकांनी ती फोडून नव्हे आणि त्यावेळी तिचे वय अवघे १९ वर्षांचे होते.




(प्रल्हाद जानी गुजरात, विना भोजन आणि पाणी पिता ७० वर्षांपेक्षा जास्त योगीजीवन जगणारे  यांच्यावर अनेक देशी विदेशी लोकांनी परीक्षणे करून असे ते कसे जगू शकतात याचे उत्तर सापडत नाही असे म्हटले जाते. - शशिकांत ओक यांनी जोडलेला मजकूर व फोटो)

दुसरा चमत्कार, ज्या गणपतीच्या दूध पिण्याचा चमत्कार या बुद्धिवाद्यांनी अनवेगिरीचा ठरवला, त्या गणपतीच्या साक्षीनेच गेली २१ वर्षे सतत घडत आहे. हा चमत्कार म्हणजे तीन चिमणे कंदिल (कानडीत 'गुब्बीलाटन) गेली २१ वर्षे सतत तेलाशिवाय जळत आहेत. प्रकाश देत आहेत.

कारवार जिल्ह्यातील मुंडगोड तालुक्यातील चिगळ्ळी या लहान खेड्यातील एका गरीब विधवा बाईच्या घरातील देव्हाऱ्यावर हे तीन कंदिल असे बिनतेलाचे जळत आहेत. विधवा हल्ली कालवश झाली असून तिची नात हल्ली त्या गावात वेगळ्या घरात राहत आहे. कारण मूळचे घर पाडून तेथे एक मंदिर उभारण्याचे काम हल्ली सुरू आहे. तो देव्हारा सर्व बाजूंनी मोकळा आहे. त्यामुळे त्याची परीक्षा कुणालाही केव्हाही घेण्यास हल्ली मोकळीक आहे.



ती

यापूर्वी अनेक बुद्धिवाद्यांनी व 'विज्ञान' वाद्यांनी त्या तिन्ही कंदिलांची अनेक तऱ्हेने तपासणी केली आहे. त्या तिन्ही कंदिलात बोट घालून त्यात तेल नसल्याची अनेकांनी खात्री केली आहे. ते कंदिल उचलून पाहून ते कुठल्याही पाइपने गुप्तरीतीने जोडले गेले नसल्याचीही खात्री केली आहे. २१ वर्षे सतत जळत राहूनही त्यांची काच धुरकटलेली काजळी माखलेली आढळून येत नाही. ते कंदिल तेलावर जळत असते तर ती एव्हाना पूर्ण काळवंडली असती. म्हणजे ते तेलावर जळत नाहीत हे उघड आहे. मग त्यांना कुठून ऊर्जेचा पुरवठा होतो? एका दिवसाच्या गणपती दूध पिण्याच्या चमत्काराची 'केशाकर्षण' व 'पृष्ठताण' यांनी उपपत्ती देण्यासाठी अहमहमिका लावलेल्या बुद्धिवाद्यांचा व 'विज्ञान' वाद्यांचा आवाज २१ वर्षे तेलाशिवाय जळणाऱ्या या कंदिलांच्या बाबतीत कुठे गेला आहे? तो आवाज आता का उठत नाही? हे तीन कंदिल गणपतीपुढे ठेवलेले असून त्याच्याच साक्षीने ते २१ वर्षे असे बिनतेलाचे जळत आहेत. आणि ही बातमी अन्नपाण्याशिवाय ५८ वर्षे जगणाऱ्या माणिक्यम्माच्या बातमीप्रमाणे- वृत्तपत्रातून अनेकदा प्रसिद्ध झाली आहे.[1] माणिक्यगिरी व चिगळ्ळी ही गावे कर्नाटकातच नव्हे तर पृथ्वीवरच नाहीत असे तर हे बुद्धिवादी आणि 'विज्ञान' वादी समजत नाहीत ना? (या कंदिलाविषयी व माणिक्यम्माविषयी सविस्तर माहिती **विज्ञान आणि चमत्कार** या ग्रंथात दिलेली असल्याने येथे त्यांचा संक्षेप केला आहे.)

[1] १. पुढारी ऑगस्ट २९, १९९४.

मानवाच्या आदिकालापासून सत् आणि असत् (Good and Evil) यांच्यामध्ये झगडा सुरू आहे. आणि तो मानव या पृथ्वीतलावर असेपर्यंत असाच चालू राहणार आहे. कारण तो मानवाच्या दोन प्रवृत्तीमधील झगडा आहे. या प्रवृत्तींना पुरातनकाळी 'देव' व 'दानव' अशी नावे देण्यात आली होती. गीतेत या प्रवृत्तींना 'दैवी संपत्ती' व 'आसुरीसंपत्ती' अशी नावे दिली आहेत. या प्रवृत्ती 'आस्तिक' आणि 'नास्तिक' या नावांनीही ओळखल्या जातात. हल्लीच्या विज्ञानयुगात या प्रवृत्ती 'श्रद्धावाद' व 'बुद्धिवाद' किंवा 'अध्यात्मवाद' व 'भौतिकवाद' या नावांनी ओळखल्या जातात. पूर्वीच्या देव व दानव यांच्या युद्धातील शस्त्रास्त्रांची जागा आता वैज्ञानिक पुराव्यांनी घेतली आहे. त्यामुळे पूर्वीच्या 'आस्तिक' आणि 'नास्तिक' या शब्दांना आता वेगळा अर्थ प्राप्त झाला आहे. दोन्ही प्रवृत्तींना या विज्ञानयुगात सत्याची तरफदारी करावी लागत असल्यामुळे सत्य प्रस्थापित करणारे इंद्रियगोचर वस्तुनिष्ठ पुरावे ही दोन्ही पक्षांची शस्त्रास्त्रे बनली आहेत; व 'वैज्ञानिक सत्य' हा दोघांचाही 'देव' बनला आहे. (नाहीतरी देवाचे अस्तित्व दोन्ही पक्षांना वस्तुनिष्ठ पुराव्यांनी सिद्ध वा असिद्ध करताच येत नाही.)

प्रस्तुत लेखकाने हे तीन ग्रंथ लिहिताना हीच भूमिका घेतली आहे. वैज्ञानिक संशोधनातून उपलब्ध होणारे वस्तुनिष्ठ पुरावे सादर करणे हेच हे तीन ग्रंथ लिहिण्यामागचे उद्दिष्ट आहे. हे करीत असताना लेखकाला स्वाभाविकच आक्रमक भूमिका घ्यावी लागली आहे. हा सत्यासाठी लढा असल्याने लढ्यात आक्रमक भूमिका घेणे अपरिहार्यच ठरते. विज्ञान हे तटस्य असते हे खरे असले, तरी विज्ञानाच्या नावाखाली असत्याचे प्रतिपादन व प्रसार तटस्थपणे पाहणे कसे शक्य आहे? तथापि ही आक्रमक भूमिका वैयक्तिक पातळीवरची नाही. असणे शक्य नाही. कारण सत्य काय व असत्य काय हा कोणाचाही वैयक्तिक प्रश्न नाही. शेवटी हे तिन्ही ग्रंथ वाचकांनी वाचल्यानंतर त्यांना एकच विनंती करावयाची आहे. ती ही की त्यांनी स्वतःअनुभव घेतल्याशिवाय कोणत्याही निष्कर्षाला येऊ नये मनुष्य हा शेवटी अपूर्ण आहे. त्याच्या शक्ती मर्यादित आहेत. त्याला सर्व विषयांचे ज्ञान मिळवणे व सर्व क्षेत्रातील अनुभव घेणे शक्य नाही. अशा परिस्थितीत. किमान वैज्ञानिक पथ्य पाळले

पाहिजे. हे किमान वैज्ञानिक पथ्य म्हणजे प्रत्यक्ष पुराव्याशिवाय कोणत्याही ठाम निष्कर्षाला न येणे. येथे लक्षात ठेवावयाची गोष्ट ही की एखाद्या गोष्टीत पुरावे मिळत नाहीत हे त्या गोष्टीच्या सत्यासत्यतेविषयीच्या ठाम निष्कर्षाला येण्याचे कारण होऊ शकत नाही. **पुरावे न मिळणे, ते नसण्याचा पुरावा होऊ शकत नाही. (The absence of evidence is no evidence of absence.) तो आपल्याच मर्यादांचा पुरावा असू शकतो.** आपल्या (अनेक कारणामुळे आलेल्या) मर्यादा न ओळखता ठाम निष्कर्ष काढणे, हा (अ) वैज्ञानिक अहंकार आहे नव्हे खोट्या वैज्ञानिकपणाची ती घमेंड (hubris) आहे. आणि एक मोठे वैज्ञानिक पातकही! कारण त्यामुळे विज्ञानाचे ध्येय जे सत्यशोधन त्याचाच पहिला बळी जातो.

हे किमान वैज्ञानिक पथ्य पाळले तरी हे तिन्ही ग्रंथ लिहिल्याचे सार्थक झाले असे लेखक समजेल. आणि हे गोठेच सार्थक म्हटले पाहिजे. कारण त्यामुळे वेगळ्या अंधश्रद्धानिर्मूलन चळवळीची गरजच उरत नाही. गरज राहील ती फक्त बुवाबाजी नाहीशी करण्याची आणि बुवाबाजी काही केवळ धार्मिक बाबा लोकच करीत नसतात. सर्वच क्षेत्रात असले बाबा लोक पसरले आहेत. त्यांची बुवाबाजी उघड करणे व नाहीशी करणे म्हणजे त्यांचे 'निर्मूलन' करणे हे सामाजिक कार्यकर्त्यांचे काम आहे. विज्ञानाचे नाही. (वैज्ञानिक क्षेत्रातील बुवाबाजी उघड करणे एवढेच विज्ञानवाद्यांचे काम आहे.)

टीप: पुरावे नसताना कोणत्याही निष्कर्षाला न येण्याचे पथ्य स्वतः अध्यात्मवादीच पाळत नसल्यामुळे देवाच्या अस्तित्वाविषयी पुरावे मिळत नसतानाही त्यावर ते विश्वास ठेवतात असे आढळून येत असल्यामुळे बुद्धिवाद्यांना अंधश्रद्धेविरुद्ध चळवळ करावी लागते, असा युक्तिवाद येथे कोणी करील. असा युक्तिवाद ज्यांना प्रामाणिकपणे करायचा आहे, त्यांनी पुन्हा एकदा या ग्रंथाची २ व ७ ही प्रकरणे वाचावीत. **विज्ञान आणि चमत्कार** हा ग्रंथ वाचल्यानंतर तरी हा युक्तिवाद कोणीच प्रामाणिक मनुष्य करणार नाही. ( प्रकरणे १३ व १६ ही या प्रश्नाचे खास उत्तर देणारी आहेत. प्रकरण १३ चा मथळा **'श्रद्धा जेव्हा मूर्त रूप धारण करते'** असाच आहे.) हा युक्तिवाद बुद्धिवादी प्रतिपक्षाच्या डोळ्यात धूळ फेकण्याच्या एकमेव उद्देशाने म्हणजे

अप्रामाणिकपणाने करीत असल्यामुळे त्यांच्या बाबतीत पुराव्यांचा प्रश्नच उपस्थित होत नाही. त्यांना कितीही पुरावे देऊन काही उपयोग नाही. (दोन मोठ्या बुद्धिवादी शास्त्रज्ञांनी 'मला पुराव्यांची गरज नाही' असे स्पष्टच म्हटले आहे. पाहा, विज्ञान आणि बुद्धिवाद या ग्रंथातील ३ रे प्रकरण आणि विज्ञान आणि चमत्कार या ग्रंथाचे १६ वे प्रकरण) म्हणूनच अंधश्रद्धा कशाला म्हणावे व ती कशी नाहीशी करावी, हा प्रश्न गौण बनतो व बुवाबाजी कशाला म्हणावे व ती खरोखर कोण करीत असतात हा प्रश्न महत्वाचा बनतो म्हणून विज्ञान आणि बुद्धिवाद या ग्रंथातील 'खरे विज्ञान व खोटे विज्ञान' या प्रकरणात मी म्हटले आहे की प्रामाणिक जादूगार परवडले. कारण ते आपली जादू सांगत नसले तरी ते प्रामाणिकपणे म्हणजे जादूरूपी फसवणुकीच्या नावाखाली ती उजळ माथ्याने करतात. पण हे बुद्धिवादी विज्ञानजगात विज्ञानवादाच्या नावाखाली वावरणारे खोटे (अप्रामाणिक) जादूगार असून म्हणजे खरे भामटे असून तेच विज्ञानाचे मोठे नुकसान करीत असतात व म्हणून विज्ञानाचे तेच खरे शत्रू आहेत.

---

**प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या पुस्तकातील प्रकरणे स्वतंत्र ई बुक मधे प्रकाशित करायला परवानगी घेऊन प्रकाशित केली आहेत.**

 **यात काही ठिकाणी समर्पक फोटो घालून प्रकरणातील मजकुराला साजेशी सजावट आणि माहितीची भर शशिकांत ओकांनी घातली आहे.**

**समाप्त**

**उज्वल बुक डेपो, अप्पा बळवंत चौक पुणे येथे उपलब्ध आहेत.**

विज्ञान आणि अंधश्रध्दानिर्मूलन

अर्थात्

# 'अंनिस'वाल्यांचा खरा चेहरा

प्राचार्य अद्वयानंद गळतगे

वेदांतविवेक प्रकाशन